**महाराष्ट्र शासन**

क्रमांक:-ससंनि ०८१८/प्र.क्र.८३/१३स,
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १४ जानेवारी, २०२०

संदर्भ- समक्रमांक दि. ७ सप्टेंबर, २०१९ रोजीचे आदेश.

**आदेश :-**

ज्याअर्थी, महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० चे कलम ७३ कब चे पोटकलम ११ च्या परंतुकान्वये गृहनिर्माण सहकारी संस्थांना निवडणूका घेण्याबाबत, दिलेल्या अधिकारानुसार, संस्थांनी निवडणुका घेण्याबाबतची कार्यपध्दती निश्चित करण्यासाठी निवडणूक नियम बनवण्याची आवश्यकता होती. त्यानुसार सहकार आयुक्तांनी नियमाचे प्रारुप तयार करण्यासाठी नियम समितीची स्थापना केली. नियम समितीमार्फत शासनास नियमाचे प्रारुप सादर होणे, त्यास विधी व न्याय विभागाची मान्यता घेऊन हरकती व सुचना मागविण्यासाठी प्रारुप नियम प्रसिध्द करणे, तसेच आलेल्या हरकती सूचना विचारात घेऊन नियम अंतिम करणे, तसेच महाराष्ट्र विधानसभा निवडणूक निवडणूकीचे आचारसंहिता सुरु होणे. यामुळे गृहनिर्माण संस्थांच्या निवडणूका घेण्याबाबतचे नियम अंतिम होण्यासाठी काही अवधी लागणार असल्याने दि. ७ सप्टेंबर २०१९ रोजीच्या आदेशान्वये गृहनिर्माण संस्थांच्या निवडणूका दि.३१/१२/२०१९ पर्यंत पुढे ढकलण्यात आल्या होत्या; आणि

ज्याअर्थी, कलम ७३ कब सुधारणा करुन २५० पर्यत किंवा त्यापेक्षा कमी सदस्य संख्या असलेल्या गृहनिर्माण सहकारी संस्थांच्या निवडणूका घेण्याचे अधिकार संबधित संस्थेला देण्यात आले असले, तरी निवडणूका घेण्याबाबतची कार्यपध्दती निश्चित नसल्याने अधिनियमातील तरतुदीनुसार निवडणुका घेण्याबाबतची कार्यपध्दती निश्चित करण्याकरीता हरकती व सूचना मागविण्यासाठी दि.२४/१०/२०१९ रोजीच्या राजपत्रात प्रारुप नियमाची अधिसुचना प्रसिद्ध करण्यात आली. सदर प्रारुप नियमाच्या अनुषंगाने हरकती व सूचना शासनास सादर करण्याची मुदत दि.२५/११/२०१९ पर्यत निश्चित करण्यात आली होती.; आणि

ज्याअर्थी, परंतु हरकती व सूचना पाठविण्यास कालावधी कमी असल्याने त्यास १५ दिवसाची मुदतवाढ देण्याची विनंती विधानसभा सदस्यांनी केली होती. सदर विनंतीच्या अनुषंगाने बुधवार दि.२०/११/२०१९ रोजी मा. मुख्य सचिव व मा. प्रधान सचिव (सहकार) यांच्यासमवेत झालेल्या बैठकीत प्रारुप नियमाच्या अनुषंगाने हरकती व सूचना शासनास पाठविण्याच्या कालावधीत १५ दिवसाची मुदतवाढ देण्यास मान्यता दर्शवली. त्यानुसार दि.२७/११/२०१९ रोजीच्या राजपत्रात प्रसिध्द केलेल्या अधिसुचनेन्वये हरकती व सूचना शासनास पाठविण्यास दि.१०/१२/२०१९ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली ; आणि

ज्याअर्थी, प्रारुप नियमाच्या अनुषंगाने शासनास मोठ्या प्रमाणत हरकती व सूचना प्राप्त झाल्या आहेत. गृहनिर्माण सहकारी संस्थांच्या निवडणूका घेण्यासाठी परिपूर्ण नियम आवश्यक असल्याने हरकती व सूचना संदर्भात चर्चा करुन नियम अंतिम करण्यासाठी मा. प्रधान सचिव यांच्या अध्यक्षेतखाली नियम समितीचे अध्यक्ष व सदस्य तसेच सहकार विभागातील इतर अधिकाऱ्यांसोबत बैठकीचे आयोजन करणे आवश्यक आहे; आणि

ज्याअर्थी, विधानमंडळाचे नागपूर येथे दि.१६/१२/२०१९ ते दि.२१/१२/२०१९ या कालावधीत पार पडलेले अधिवेशनात अधिकारी व्यस्त असणे, नागपूर हिवाळी अधिवेशनात मा. मुख्यमंत्री महोदयांनी राज्यातील शेतकऱ्यांसाठी महात्मा जोतीराव फुले शेतकरी कर्जमुक्ती योजना- २०१९ ही योजना जाहीर करणे, सदर योजना ही अत्यंत महत्त्वाची असून योजनेचे काम विहित वेळेत पूर्ण करण्यासाठी कर्जमाफी योजनेच्या कामात व्यस्त असलेले सहकार विभागातील मोठ्या प्रमाणातील अधिकारी, अंतिम प्रारुपास विधि व न्याय विभागाची मान्यता घेणे, या कारणामुळे गृहनिर्माण सहकारी संस्थांच्या निवडणूकांचे नियम अंतिम करणे नजिकच्या दोन महिन्यात शक्य होणार नसणे;

त्याअर्थी, वर नमुद केलेल्या कारणांमुळे दि. २९ फेब्रुवारी, २०२० पर्यत निवडणुक नियम अंतिम करणे शक्य होणार नाही. तथापी, २५० पर्यत किंवा त्यापेक्षा कमी सदस्य असणा-या गृहनिर्माण सहकारी संस्थांच्या निवडणुका पारदर्शी होण्यासाठी निवडणुक नियमांची आवश्यकता असल्याने निवडणुकीस पात्र असणा-या, संदर्भाधीन आदेशान्वये दि. ३१ डिसेंबर, २०१९ पर्यत पुढे ढकलण्यात आलेल्या गृहनिर्माण सहकारी संस्थांच्या समितीच्या निवडणुका या आदेशान्वये दि.२९ फेब्रुवारी, २०२० पर्यंत पुढे ढकलण्यात येत आहेत.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२००११५११२०१६५३०२ असा आहे.हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Chaudhary Anil Jayaram

Digitally signed by Chaudhary Anil Jayaram
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co- Operation Marketing and Textile, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f26cf80358fa3133e4d85ddac30ae54b06c63743fd5510dc0ebca082b6c483ce, cn=Chaudhary Anil Jayaram
Date: 2020.01.15 10:58:58 +05'30'

**(अनिल ज.चौधरी)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. सहकार आयुक्त निबंधक, सहकारी संस्था पुणे.
२. सचिव, राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, पुणे.
३. विभागीय सहनिबंधक कोल्हापूर, सहकारी संस्था.
४. उपनिबंधक/जिल्हा उपनिबंधक, कोल्हापूर, सागंली व सातारा सहकारी संस्था
५. निवडनस्ती-१३स